**वन विभागाची पुनर्रचना मानव संसाधन विकास योजनेत्तर योजनेतील अस्थायी पद सन २०२५-२६ मध्ये चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : एफडीएम -२०२५/प्र.क्र.१२/फ-२**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- ११ मार्च, २०२५

**वाचा** :- १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दि.१३.०९.२०१९ व दि.२१.०९.२०२१.

२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक- एफडीएम २०२४/प्र.क्र.२०/फ-२ दि.०१.१०.२०२४.

३) उप वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर यांचे पत्र क्र.जा.क्र. कक्ष-३/योजनेत्तर/प्र.क्र.१५ (२४-२५)/५५०/२५-२६, दि.१४.०२.२०२५.

४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि २०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.०३.०३.२०२५.

**प्रस्तावना:-**

वन विभागाची पुनर्रचना मानव संसाधन विकास या योजनेतर योजनेखाली "वाचा" क्र.२ येथील दि.०१.१०.२०२४ च्या शासन निर्णयान्वये १ अस्थायी पदास सन २०२४-२५ मध्ये दि.०१.०९.२०२४ ते दि.२८.०२.२०२५ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासनाची मान्यता देण्यात आली होती. त्या अनुषंगाने उप वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर यांनी उपरोक्त "वाचा" क्र.३ येथील दि.१४.०२.२०२५ रोजीच्या प्रस्तावान्वये, सदरहू १ अस्थायी पदास दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत पुढे चालू ठेवण्याबाबत शासनास विनंती केली आहे. "वाचा" क्र.४ येथील दि.०३.०३.२०२५ रोजीच्या वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये, दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहेत. त्यानुसार सदर अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वन विभागाची पुनर्रचना मानव संसाधन विकास या योजनेतर अंतर्गत पुढीलप्रमाणे दर्शविलेल्या विवरण पत्रातील १ अस्थायी पद हे "वाचा" क्र.१ येथील शासन निर्णयान्वये वन विभागाच्या मंजूर आकृतीबंधात समाविष्ट असल्याने, या १ अस्थायी पदास वित्त विभागाच्या संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णय दि.०३.०३.२०२५ च्या अधिन राहून दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत चालू ठेवण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | उप वनसंरक्षक (मानव संसाधन व्यवस्थापन) | १ |
| | **एकूण** | **१** |

**२.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक पदनि-२०१६/ प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३.०३.२०२५ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. तथापि, सदरहू शासन निर्णयातील तरतुदींचे योग्यरित्या पालन होईल, याची दक्षता प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी घ्यावी.

**३.** सदरहू अस्थायी पदाच्या वेतनावरील खर्च 'प्रधान शीर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेतर) ०१ वनीकरण ००१ संचालन व प्रशासन (०१) संचालन व प्रशासन (०१) (०१) मुख्य वनसंरक्षक (२४०६ ००२२) ०१ वेतन या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा व सन २०२५-२६ यावर्षी त्याखालील मंजूर होणा-या अनुदानातून भागविण्यात यावा.

**४.** सदर शासननिर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३१११५४४३५२८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

RAMESH NAMDEO JAGTAP

Digitally signed by RAMESH NAMDEO JAGTAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=0c19f5aff07e8e032316c50df2eee86d4eadc6e4ac1e502c4ce53a7762e7e059, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B42F1BB542CD2BC481C3C6F994B28EBD58BB368E14A9C6CBD23808C8315A965C, cn=RAMESH NAMDEO JAGTAP
Date: 2025.03.11 15:45:40 +05'30'

**(रमेश जगताप)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रतिलिपी** :-

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन - दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (सर्व)/मुख्य वनसंरक्षक (सर्व)
५) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
६) वित्त विभाग, व्यय १०/अर्थसं-४/ वित्तिय सुधारणा, मंत्रालय, मुंबई.
७) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
९) कार्यासन अधिकारी, ब-१ महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) निवडनस्ती, महसूल व वन विभाग, फ-२ कार्यासन.